सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील सिंधुदुर्ग येथील जीएनएम महाविद्यालयामधून श्रेणीवर्धित बी.एस्सी. (नर्सिंग) महाविद्यालयास बी.एस्सी. (नर्सिंग) अभ्यासक्रमासाठी मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२०२५/प्र.क्र.२३७/२५/(ई-११२२८१६)/ शिक्षण-१**

९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक: ५ जून, २०२५

वाचा:- १) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.डीएमईआर-११०१४/५०/२०२५-सीईटीआयटी, दि.२४.०४.२०२५.

२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय, क्र.एनयुआर- २०१७/प्र.क्र.२१२/१७/ शिक्षण-१, दि. २८.०२. २०१८.

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत जिल्हा रुग्णालय, सिंधुदुर्ग या संस्थेशी संलग्नित जीएनएम अभ्यासक्रम महाविद्यालयाचे श्रेणीवर्धन बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रम महाविद्यालयात करण्याकरिता केंद्र शासनाची मान्यता प्राप्त झाली आहे. यास्तव सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय यांच्यामार्फत सदर संस्थेत ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव या विभागास सादर करण्यात आला होता. जिल्हा रुग्णालय, सिंधुदुर्ग येथील जीएनएम अभ्यासक्रम महाविद्यालयाचे श्रेणीवर्धन करुन बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रमासाठी आवश्यक सोयी-सुविधांची उपलब्धता तपासण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील तरतुदींनुसार सदर संस्थेची वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत नि:शुल्क सक्षमता तपासणी करण्यात आली.

२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी सक्षमता तपासणी समितीचा अहवाल संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सक्षमता तपासणी समितीने उक्त संस्था बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रम सुरु करण्यास सक्षम असल्याची शिफारस केली आहे. सक्षमता तपासणी समिती व आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांची शिफारस विचारात घेऊन उक्त संस्थेस शैक्षणिक वर्ष २०२५-२६ साठी ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सक्षमता तपासणी समिती व आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांची शिफारस विचारात घेऊन, सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील जिल्हा रुग्णालय, सिंधुदुर्ग येथील जीएनएम अभ्यासक्रम महाविद्यालयामधून श्रेणीवर्धन झालेल्या बीएस्सी (नर्सिंग) महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ साठी ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह बीएस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रम सुरु करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेशाकरिता राज्य शासन/ केंद्रशासन/ मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार कार्यपद्धती अवलंबण्यात यावी.

२) भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक व राज्य शासन यांनी बी.एस्सी. नर्सिंग अभ्यासक्रमासाठी विहित केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

३) भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली यांनी घातलेल्या अटींची पूर्तता करणे संस्थेस बंधनकारक राहील.

४) शासकीय नियम / अधिनियमाच्या आधारे तसेच मा.सर्वोच्च न्यायालय व मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्कासाठी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून त्यानुसार शैक्षणिक शुल्क निश्चित करण्यात यावे.

५) भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी बी.एस्सी. नर्सिंग अभ्यासक्रमासाठी विहित केलेल्या प्रमाणकांची योग्यरित्या पूर्तता करून संस्थेने प्रथम तुकडी बाहेर पडेपर्यंत दरवर्षी शासनाची मान्यता मिळविणे आवश्यक आहे.

६) सदर मान्यता वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांच्या शिफारशीस अनुसरून देण्यात येत आहे.

७) संस्थेने बी.एस्सी. नर्सिंग महाविद्यालयास महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाची संलग्नता मिळाल्यानंतरच विद्यार्थी प्रवेशित करावेत.

८) संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशित करु नयेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ च्या कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०५१७११५८९७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.06.05 17:12:32 +05'30'

**(डॉ. तुषार पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, भारतीय परिचर्या परिषद, ८ वा मजला, एनबीसीसी सेंटर, प्लॉट नं.२, कम्युनिटी सेंटर, आखला फेज-१, नवी दिल्ली.
७. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई.
८. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

९. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.

१०.सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ व ९ वा मजला, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट, मुंबई.

११.सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, शासकीय तंत्रज्ञान इमारत, ३०५, ३ रा मजला, ४९, खेरवाडी, वांद्रे (पूर्व), मुंबई.

१२.आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, ८ वा मजला, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट, मुंबई.

१३.प्रबंधक, महाराष्ट्र परिचर्या परिषद, मुंबई.

१४.प्राचार्य, शासकीय नर्सिंग महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, सिंधुदुर्ग

१५.निवडनस्ती (शिक्षण-१).